**नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिपत्याखालील आस्थापनेवरील अनुसचित जमाती प्रवर्गातून - नियुक्त झालेले तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करू न शकलेले गट-"क" या संवर्गातील कर्मचारी यांचेकरिता अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आस्थाप-२०२५/१४०/प्र.क्र.४६/म-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ :**

१) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांचे पत्र क्र.९/आस्था-३/अधिसंख्य पदे/श्री.कोळी/२०२/२०२५, दि. ३०/०१/२०२५.
२) वित्तविभाग, शासन निर्णय क्र.असंक-१००१/प्र.क्र.२१/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०/०९/२००१.
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१/१२/२०१९.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३०/०६/२०२०
५) सामान्य प्रशासन विभाग, शुध्दिपत्रक क्र. बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.२८/०९/२०२०
६) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४/१२/२०२२
७) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी ११२३/प्र.क्र.२९ /आरक्षण-२, दि.०४/१०/२०२४.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये, मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र.८९२८/२०१५ (चेअरमन आणि मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुद्ध जगदिश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दि.०६/०७/२०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही असा निर्णय दिला. सदर निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी मा.उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी, रिट याचिका क्र.३१४०/२००८ मध्ये दि.२८/०९/२०१८ च्या आदेशान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार दि.३१/१२/२०१९ पर्यंत कार्यवाही करण्याचे आदेश दिले, यास अनुसरुन अशा अधिकारी/कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करुन या अधिसंख्य पदावर अधिकारी/कर्मचारी यांना वर्ग करण्याची कार्यवाही करण्याची सूचना दिली आहे. सदर शासन निर्णयानुसार, नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांच्या अधिनस्त कार्यालयातील आस्थापनेवर अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेले, अवैध ठरल्यानंतर जात पडताळणी समितीच्या निर्णयाविरोधात मा.न्यायालयात याचिका दाखल केलेले मात्र मा. न्यायालयाने स्थगिती न दिलेले व जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवा समाप्त केलेले **गट-"क"** संवर्गातील एक अधिसंख्य पद नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांच्या अधिनस्त आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे. सदर पदाचा तपशील सोबतच्या विवरणपत्र क्र.१ मध्ये नमुद केला आहे.

**०२.** संदर्भिय शासन निर्णयापूर्वी सेवासमाप्त करण्यात आलेले कर्मचारी हे सेवासमाप्त पुर्वी ज्या पदावर कार्यरत होते, त्या पदाकरिता अधिसंख्य पद निर्माण करून सदर अधिसंख्य पद तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत सदर अधिकारी/ कर्मचारी यांच्याकरिता अधिसंख्य पद अस्तित्वात राहील.

**०३.** सदरहू गट-क संवर्गातील सेवा समाप्त करण्यात आलेले श्री. हणमंत ज्ञानू कोळी यांचे अधिसंख्य १ पद नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त आस्थापनेवर विवरणपत्र १ नमूद केलेल्या (अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात आल्याचा दिनांका ) दिनांका पासून निर्माण करण्यात येवून त्या अधिसंख्य पदावर संबंधित कर्मचा-यांच्या सेवा वर्ग करण्यात याव्यात.

**०४.** तसेच सदर अधिसंख्य पदावरील मुदतवाढीस सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १४.१२.२०२२ अन्वये देण्यात आलेला तांत्रिक खंड सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक ०४.१०.२०२४ मधील तरतूदीनुसार सर्व सेवाविषयक (पदोन्नती व अनुकंपा धोरण वगळून) व सेवानिवृत्ती विषयक लाभांसाठी क्षमापित करण्यात येत आहे.

**०५.** अधिसंख्य पदावर वर्ग करण्यापूर्वी संबंधित कर्मचा-यांना जेवढे मासिक वेतन व भत्ते मिळत होते, तेवढे वेतन व भत्ते त्यांना पुढील आदेश होईपर्यंत देण्यात यावेत.

**०६.** अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च हा संबंधित कर्मचारी सध्या ज्या कार्यालयात कार्यरत आहेत त्या विभागाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**०७.** सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१/१२/२०१९, तसेच शुध्दीपत्रक क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.२८.०९.२०२० व क्र.बीसीसी-२०१९/प्र.क्र. ५८१ ए/ १६-ब, दि.१४.१२.२०२२ मधील तरतुदीनुसार व सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३०/६/२०२० अन्वये प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारान्वये सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**०८.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०२२७१६१७१८१९१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

PRACHI SUBHASH PALAV

Digitally signed by PRACHI SUBHASH PALAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=b12a57f3f1547a8767ce0e7181ecb77647d3da9cac2c120c823eb1b68c07dd43, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5479aef7e1148d256d58123c94081f8b8c9af5cfce5aaf933dfa4dc33e2de372, cn=PRACHI SUBHASH PALAV
Date: 2025.02.27 16:18:47 +05'30'

**( प्राची सुभाष पालव )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपुर.

३) वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

४) सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन- १६-ब), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

५) निवडनस्ती कार्यासन ई-६. महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. अस्थाप-२०२५/१४०/प्र.क्र.४६/म-१, दि.२७ फेब्रुवारी, २०२५ सोबतचे विवरणपत्र- १**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवर व त्यांच्या अधिपत्याखालील आस्थापनेवरील यापूर्वी सेवासमाप्त करण्यात आलेले गट-क मधील निम्नलिखित कर्मचाऱ्यांकरिता निर्माण करण्यात येणारे अधिसंख्य पद.

| अ. क्र. | अधिकारी /कर्मचा-याचे नाव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक | सेवा समाप्त करण्यात आल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. हणमंत ज्ञानू कोळी | कनिष्ठ लिपिक, गट-क | ०१.१२.१९९८ | १५.१०.२००३ |

-------------